**एकत्रित परिविक्षाधिन कार्यक्रम -७ (सीपीटीपी-७) अंतर्गत उमेदवारांच्या जिल्हा सलग्नता प्रशिक्षणाबाबत .**
**उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्रमांकः टिआरएन-२०२२/७०९/प्र.क्र. २/उद्योग-३**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४००० ०३२
दिनांक: १२ जानेवारी, २०२२

**संदर्भ :-**

१) शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्रमांक टिआरएन-२०१३/प्र.क्र. ८४/१३/१२-अ, दि. २०/०१/२०१४.
२) सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्रमांक टिआरएन-१०२१/प्र.क्र. ३७ / सीपीटीपी-ब, दि. २४/१२/२०२१
३) सामान्य प्रशासन विभागाचे शासन पत्र क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र. ३७/सीपीटीपी-ब, दि. २९/१२/२०२१.
४) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक टिआरएन-०९२१/ प्र.क्र.४२/ सीपीटीपी, दि.१०.१.२०२२
५) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र. उसं/आस्था/सीपीटीपी/२०२२/अे-७, दि. ०४/०१/२०२२.

## -: शासन आदेश :-

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेव्दारे प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या अधिकाऱ्यांचे एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम विहित करण्यात आला असून सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील आदेशान्वये उद्योग अधिकारी (तां) गट-ब या संवर्गातील एकूण २३ प्रशिक्षणार्थी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना नियुक्ती देण्यात आली आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये सीपीटीपी-७ या प्रशिक्षणाची सुरवात दि.१७.१.२०२२ ते दि.११.२.२०२२ या ४ आठवड्याच्या खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्प्याने होणार असल्याचे कळविले असून त्यानुसार संबंधित प्रशासकीय विभागांनी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या जिल्हा वाटपाचे आदेश निर्गमित करण्याच्या सूचना प्राप्त झाल्या आहेत. तसेच संदर्भ क्रमांक ४ येथील परिपत्रकान्वये सदर प्रशिक्षणाच्या अनुषंगाने आवश्यक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्याप्रमाणे उद्योग संचालनालयाने संदर्भ क्र. ५ च्या पत्रान्वये एकूण २३ अधिकाऱ्यांना जिल्हा संलग्नात प्रशिक्षणासाठी नियुक्तीसाठी प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

२. उपरोक्त पार्श्वभूमीवर एकत्रित परिविक्षाधिन प्रशिक्षण कार्यक्रम-७ अंतर्गत खालील तक्त्यातील स्तंभ २ येथील परिविक्षाधीन उद्योग अधिकारी (तांत्रिक) यांना स्तंभ क्र. ४ व ५ येथे नमूद केल्यानुसार अनुक्रमे महसूली विभाग व जिल्हा वाटप करण्यात येत आहे.

**परिविक्षाधीन उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब**

| अ.क्र. | परिवीक्षाधीन उद्योग अधिकारी (तांत्रिक) गट-ब यांचे नांव | मूळ जिल्हा | प्रशिक्षणासाठी वाटप करण्यात आलेला महसूली विभाग व जिल्हा | |
|---|---|---|---|---|
| | | | महसूल विभाग | जिल्हा |
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्री. शिवराज शहाजी डोंगरे | सातारा | नाशिक | अहमदनगर |
| २ | श्री. साकेत घनश्याम पांडे | गडचिरोली | अमरावती | अमरावती |
| ३ | श्री. सुशांत अधिकराव साळुंके | सातारा | नाशिक | जळगाव |
| ४ | श्री. प्रशांत सदाशिव पाटील | कोल्हापूर | कोकण-१ | सिंधुदुर्ग |
| ५ | श्री. अमरजीत हणमंत गायकवाड | सांगली | कोकण-१ | रत्नागिरी |
| ६ | श्री. जगदीश सुर्यकांतराव जगताप | हिंगोली | अमरावती | बुलढाणा |
| ७ | श्री. श्रीनिवास प्रेमसिंग चव्हाण | नांदेड | अमरावती | यवतमाळ |
| ८ | श्री. संकेत रघुनाथ कदम | रत्नागिरी | पुणे | कोल्हापूर |
| ९ | श्री. ऋतुराज शिवदास सूर्या | वाशिम | पुणे | पुणे |
| १० | श्री. सारंग ठाणसिंग पाटले | भंडारा | अमरावती | अकोला |
| ११ | श्री. भागवत रामदास गादेकर | बुलढाणा | नागपूर | भंडारा |
| १२ | श्री. विजय दादाराव काकड | बीड | पुणे | सातारा |
| १३ | श्री. कुणाल सुभाष गोंडचवार | अमरावती | नागपूर | गोंदिया |
| १४ | श्रीम. श्रद्धा आनंद मगर | नाशिक | कोकण-२ | ठाणे |
| १५ | श्रीम. पुनम सुधाकर घुले | औरंगाबाद | नाशिक | अहमदनगर |
| १६ | श्रीम. पल्लवी ज्ञानेश्वर वाडेकर | पुणे | औरंगाबाद | नांदेड |
| १७ | श्रीम.ऋतुजा अरुण नाईकवाडे | उस्मानाबाद | पुणे | सांगली |
| १८ | श्री. निलेश राजाराम सातपुते | कोल्हापूर | औरंगाबाद | उस्मानाबाद |
| १९ | श्रीम. प्रतिक्षा दिवाकर नक्षिणे | गडचिरोली | अमरावती | वाशिम |
| २० | श्री. तुषार अशोकराव आठवले | यवतमाळ | नागपूर | नागपूर |
| २१ | श्री. दिग्विजय चांगदेव पोळ | नाशिक | कोकण-१ | पालघर |
| २२ | श्रीम. प्रतिभा शामराव देठे | यवतमाळ | नागपूर | वर्धा |
| २३ | श्री. अक्षय सुदाम साळुंके | अहमदनगर | कोकण-२ | ठाणे |

३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई यांनी उपरोक्त तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना सीपीटीपी-७ अंतर्गत खातेनिहाय जिल्हा संलग्नता या टप्यासाठी दि.१७.१.२०२२ ते दि.११.२.२०२२ या ४ आठवड्यांच्या कालावधीसाठी वर नमूद महसूल विभाग व जिल्हा वाटपानुसार निर्देशित कार्यालयात रुजू करुन जिल्हा संलग्नता प्रशिक्षण टप्यातील प्रशिक्षणासंदर्भात विहित करण्यात आलेल्या प्रशिक्षण कार्यक्रम व संदर्भ क्रमांक ३ व ४ नुसार दिलेल्या सूचनांप्रमाणे पुढील कार्यवाही करावी. खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाच्या ४ आठवड्यांच्या कालावधीनंतर उमेदवारांचे पायाभूत प्रशिक्षण व संस्थात्मक प्रशिक्षण सुरु होणार असल्याने याबाबत वनामती, नागपूर या प्रशिक्षण संस्थेने दिलेल्या निर्देशानुसार पुढील कार्यवाही करण्यात यावी.

४. परिवीक्षाधीन अधिकारी यांचे प्रशिक्षण कालावधीतील मुल्यमापन करण्यासाठी शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र. टिआरएन-२०१६/प्र.क्र. ५८/सीपीटीपी, दि. ०४/०१/२०१७ मधील निर्देशानुसार आवश्यक ती कार्यवाही करण्याची जबाबदारी नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांची राहील. त्यासाठी ज्या विभागीय कार्यालयाच्या कार्यकक्षेतील जिल्हा कार्यालयामध्ये प्रशिक्षणार्थी अधिकारी प्रशिक्षण घेत असतील त्या उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय यांनी या आदेशासोबत जोडलेल्या प्रपत्र-अ मध्ये संबंधित परिविक्षाधीन अधिकाऱ्यांच्या प्रशिक्षण कालावधीतील मुल्यमापन अहवाल समन्वय अधिकारी म्हणून तयार करुन नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांना पुढील कार्यवाहीस्तव सादर करावा.

५. सदरहू परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी संदर्भ क्र. २ येथील नियुक्ती आदेशातील अटी व शर्ती तसेच, खाली नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशिक्षण कालावधीमधील खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षण पूर्ण करणे अनिवार्य आहे.

१) सर्वसाधारणपणे राज्यसेवा गट-अ व गट-ब च्या अधिकाऱ्यांसाठी महाराष्ट्र शासनाने विहीत केलेले इतरही नियम या परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना लागू असतील व त्या नियमांचे पालन करणे त्यांना बंधनकारक राहील.

२) प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन अधिकारी यांनी त्यांची दैनंदिन रोजनिशी ठेवावी व ती अद्ययावत ठेवावी.

३) ज्या महसुली विभागामध्ये परिविक्षाधीन अधिकारी कार्यरत आहे त्या उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय यांनी परिविक्षाधीन अधिकाऱ्यांवर प्रत्यक्ष नियंत्रण ठेवावे तसेच त्यांनी केलेल्या कामकाजाचे मुल्यमापन करावे. तसेच संबंधित प्रशिक्षणार्थी उमेदवारांचा प्रत्येक महिन्याचा प्रशिक्षण अहवाल प्रमाणित करुन नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी, उद्योग संचालनालय, मुंबई यांना पुढील कार्यवाहीस्तव सादर करावा.

४) प्रशिक्षण कालावधीत परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी गैरवर्तन केल्याचे अथवा विहित प्रशिक्षण पुरेशा गांर्भीर्याने घेत नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्याबाबतचा अहवाल त्वरीत सबंधित उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय यांनी नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी यांचेकडे विनाविलंब पाठवावा. तसेच गैरवर्तनाची नोंद संबंधितांच्या वैयक्तीक सेवा अभिलेखात नोंदवाव्यात.

५) परिविक्षाधीन अधिकारी यांना प्रशिक्षणासाठी निश्चित करुन दिलेल्या जिल्हयात रुजू झाल्यानंतर त्याबाबतचा अनुपालन अहवाल परिविक्षाधिन अधिकारी यांनी संबंधित उद्योग सहसंचालक, विभागीय कार्यालय यांचेमार्फत नोडल अधिकारी तथा आस्थापना अधिकारी उद्योग संचालनालय, मुंबई यांचेकडे सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११९१२५२१३८६१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra V Gurav

Digitally signed by Ravindra V Gurav
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY, LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0030b22364370f4d96ab251b7263219586c0069b661c3f9cd6fd67e55000ce92, pseudonym=B67CC3974B29D17A658E4CE714FCD068FD7E189B, serialNumber=9DFB7AEFBD9E82B129C324D567B46E1D853D93C38D6E222C868EAC72ECD12784, cn=Ravindra V Gurav
Date: 2022.01.19 12:53:27 +05'30'

**( रविंद्र गुरव )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई
२) सर्व संबंधित अधिकारी (विकास आयुक्त (उद्योग) उद्योग संचालनालय, मुंबई यांचे मार्फत)

**प्रत :**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा), मुंबई/नागपूर
२. उप सचिव (सीपीटीपी) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
३. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, राजभवन आवार, बाणेर रोड, पुझे
४. संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्ता व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, वनामती, बोले पेट्रोल पंप जवळ, अमरावती रोड, धरमपेठ, नागपूर- ४४२ ४१०
५. उद्योग सह संचालक, विभागीय कार्यालय (सर्व)
६. महाव्यवस्थापक/व्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व)
७. सर्व संबधित जिल्हा कोषागार अधिकारी
८. निवडनस्ती (उद्योग-३).